**आदिवासी भागामध्ये सांस्कृतिक संकुल बांधणे.**

**महाराष्ट्र शासन**

शासन निर्णय, क्रमांक संकीर्ण-२००१/प्र.क्र.२३८(२००१)/का.०८
आदिवासी विकास विभाग
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनाक : १५ मे, २००४.

**वाचा :** मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे पत्र क्रमांक : जा.क्र.मुवाशा/न.न.(संकीर्ण)/प-७/२५१, दि. ११.२.२००४

**प्रस्तावना** :-

आदिवासी समाजातील लोककला, सामूहिक लग्न, परंपरागत सण, उत्सव आणि त्यांच्यातील उपजत कलागुणांना व सांस्कृतिक कार्यक्रमांना चालना देण्याच्या दृष्टीने आदिवासी भागामध्ये जागा उपलब्ध नसते. त्यामुळे त्यांच्यातील असलेले कौशल्य व इतर गुणांना वाव नसतो आणि त्यांच्यात असलेले कौशल्य आणि सांस्कृतिक बुजरेपणा घालविणे इत्यादि बाबी लक्षात घेता, शासनाकडे विविध स्तरावरुन आदिवासींसाठी सांस्कृतिक संकुल बांधून देण्याकरिता शासनाकडून अनुदान मिळावे याकरिता निवेदने प्राप्त झालेली होती. त्यास अनुसरुन आदिवासींकरिता सांस्कृतिक संकुल बांधून देण्याची योजना अंमलात आणण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**राज्यातील आदिवासी उपयोजना क्षेत्र, आदिवासी उपयोजना बाहेरील क्षेत्र, माडा/मिनीमाडा यामध्ये "आदिवासींकरिता सांस्कृतिक संकुल बांधणे या योजनेस शासन मान्यता देत आहे. तसेच मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांनी आदिवासी सांस्कृतिक भवनाचा जो प्रारुप नकाशा संदर्भाधीन पत्रान्वये सादर केला आहे त्यास मान्यता देण्यात येत आहे व मुख्य वास्तुशास्त्रज्ञ यांनी तयार केलेला आदिवासी सांस्कृतिक भवनाचा आराखडा सोबत जोडला आहे.

२. **योजनेच्या अटी व शर्ती**

| | |
|---|---|
| १) योजनेचे नांव | आदिवासी भागामध्ये सांस्कृतिक संकुल बांधणे |
| २) योजनेचे उद्दीष्ट | आदिवासींच्या सांस्कृतिक, सामाजिक कलागुणांना चालना देणे. |
| ३) योजनेचे लाभक्षेत्र | राज्यातील आदिवासी उपयोजना क्षेत्र, आदिवासी उपयोजना बाहेरील क्षेत्र, माडा/मिनीमाडा क्षेत्रातील, ग्रामपंचायत, नगरपालिका व नोंदणीकृत आदिवासी स्वयंसेवी संस्था पात्र असतील. एका तालुक्यामध्ये जास्तीत जास्त दोन सांस्कृतिक संकुल मंजूर करण्यात येतील. |
| ४)सांस्कृतिक संकुल बांधण्या करिता करावयाची शिफारस. | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्पामार्फत शिफारस करण्यात यावी. |

| | |
|---|---|
| ५) निधीची उपलब्धता. | या योजनेकरिता राज्यस्तरीय योजनेतील मागासवर्गीयांचे कल्याण या लेखा शीर्षांतर्गत निधी उपलब्ध करुन देण्यात येईल. |
| ६)योजनेची अंमलबजावणी करणारी यंत्रणा | इमारतीच्या नकाशास व अंदाजित खर्चास प्रशासकीय विभागाकडून प्रशासकीय मान्यता मिळाल्यानंतर अपर आयुक्त, आदिवासी विकास हे संकुलाच्या बांधकामास राज्य पातळीवरील वर्तमानपत्राद्वारे निविदा मागवून कार्यवाही करतील. |
| ७) बांधकामाकरिता उपलबध करुन द्यावयाची जागा. | बांधकामाकरिता जागा ही संबंधित ग्राम पंचायत / नगरपालिका / महानगरपालिका यांनी विनामुल्य उपलब्ध करुन दयावी. |
| ८) बांधकामाचे क्षेत्रफळ | कमीत कमी ४३७ चौ. मी. बांधकामाचे क्षेत्रफळ असावे. संकुलामध्ये सास्कृतिक सभागृह, शौचालय/स्नानगृह, अतिथीगृह, प्रशिक्षण कक्ष इ. बाबी प्रामुख्याने असाव्यात. |
| १०) कमाल आर्थिक मर्यादा | रु. २५.०० लाख |

३. आदिवासी सांस्कृतिक संकुलाच्या सार्वजनिक वापराबाबत खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी:-

१) अनुदानाची रक्कम बांधकामाच्या प्रगतीप्रमाणे वितरित करावी आणि या इमारतीवर अंतिम मालकी शासनाची राहील.

२) त्या परिसरातील आदिवासी समाजातील लोकांना लोककला, सांस्कृतिक,विवाह समारंभ कार्यक्रमाला व इतर गुणाना चालना देण्याच्या दृष्टीने संबंधितांना संकुल विनामूल्य उपलब्ध करुन द्यावे.

३) शासकीय कार्यक्रमाकरिता सदर संकुल विनामूल्य उपलब्ध करुन द्यावे.

४) इतर खाजगी कामाकरिता संकुल इतरांना उपलब्ध करुन द्यावयाचे झाल्यास सार्वजनिक बांधकाम विभागाकडून दर चौ. फुटाकरिता जो आकार निश्चित केलेला असेल त्यानुसार प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांनी शुल्क आकारावे. त्याबाबतचा हिशेब ठेवण्यात यावा आणि या मिळणाऱ्या उत्पन्नामधून सदर संकुलाचे व्यवस्थापन/देखभाल करण्यात यावे. संकुल उपलब्धतेबाबत वाद निर्माण झाल्यास याबाबतचा निर्णय घेण्याचा अधिकार प्रकल्प अधिकारी यांना राहील व ते संबंधितांना बंधनकारक राहील.

५) आदिवासी सांस्कृतिक संकुलाचे देखभाल, दुरुस्ती व व्यवस्थापनाबाबत याकरिता खालील नमूद केलेल्या अधिकाऱ्यांची समिती गठीत करण्यात येत आहे :-

१) प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,(संबंधित)

२) गट विकास अधिकारी, पंचायत समिती,(संबंधित)

३) उप अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग (संबंधित)

४. स्थानिक स्वराज्य संस्थांकडे सांस्कृतिक संकुलांचे व्यवस्थापन हस्तांतरित करण्याचा प्रसंग उद्‌भवल्यास त्या ठिकाणी त्यांचा सहभाग असलेली समिती शासनाकडून गठित करण्यात येईल.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्रमांक-विअप्र-१००/प्र.क्र.४६/ २००१/विनियम, दि. ११ जुलै २००१ परिशिष्टातील भाग-१ ला उपविभाग-५ मधील अनु.क्र. १ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने

**( अ. मा. आत्राम )**
**कार्यासन अधिकारी**